**शासनाकडे प्राप्त झालेल्या ३६५ तक्रार अर्जातील नमूद वस्तुस्थितीची पडताळणी करुन जबाबदारी टाळणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
शासन परिपत्रक क्र.अहत-१६०९/प्र.क्र.४४/०९/११-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: **३ ऑगस्ट, २००९**

**शासन परिपत्रक :-**

मा.मुख्यमंत्री यांची श्री.अण्णा हजारे यांच्या समवेत दि.२८.७.२००९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये शासनाकडे प्राप्त झालेल्या ३६५ तक्रार अर्जांवरील कार्यवाहीच्या अनुषंगाने चर्चा झाली. त्यावेळेस सदर तक्रारींपैकी ७० तक्रारीवरील कार्यवाही पूर्ण झाली असली तरी उर्वरित तक्रारीवरील कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने या तक्रारी संबंधात जबाबदारी टाळणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करावी अशी मागणी श्री.अण्णा हजारे यांनी केली असता अशी कार्यवाही करण्यासाठी जबाबदारी टाळणाऱ्या संबंधित अधिकाऱ्यांना प्रथम कारणे दाखवा नोटीस देण्याचे बैठकीत ठरले.

बैठकीतील सदर निर्णयास अनुलक्षून या तक्रार अर्जामध्ये नमूद केलेल्या वस्तुस्थितीची पडताळणी करावी व तक्रार अर्जात नमूद केल्यानुसार संबंधित अधिकाऱ्यांनी जबाबदारी टाळली असल्याचे प्रथमदर्शनी विभागाचे मत झाल्यास अशा सर्व अधिकाऱ्यांना प्रथम कारणे दाखवा नोटीस देण्याची कार्यवाही तातडीने करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०८०३१८५३४५००१ असा आहे.

आदेशानुसार,

**(प्र.ल.पाठक)**
**उप सचिव**

प्रति,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
मुख्य सचिवांचे सचिव,
निवडनस्ती